**राज्य माहिती आयोग, अमरावती खंडपीठ येथे प्रतिनियुक्तीने कार्यरत श्री. ग.र. कठाळे, सहायक कक्ष अधिकारी यांच्या प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एएससी १५१७/प्र.क्र.१३७ (भाग-३)/१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २४ फेब्रुवारी, २०२३

वाचा : १) या विभागाचे आदेश क्र. एएससी १५१७/प्र.क्र.१३७/१४-अ, दि. ०३-१०-२०१८.
२) या विभागाचे आदेश क्र. एएससी १५१७/प्र.क्र.१३७/१४-अ, दि. १८-०२-२०२१
३) उपसचिव, राज्य माहिती आयोग, खंडपीठ अमरावती यांचे पत्र क्र. रामाआ/अमरावती/ प्र.क्र.२८/ २०२०/आस्था ४५००/२०२२, दि. १२-१२-२०२२

**शासन आदेश**

संदर्भाधिन क्र. १ येथील दिनांक ०३-१०-२०१८ रोजीच्या आदेशान्वये श्री. ग.र. कठाळे, सहायक कक्ष अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांची राज्य माहिती आयोग, अमरावती खंडपीठ या कार्यालयात २ वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली होती. त्यानुसार श्री. कठाळे हे दि. २६-१०-२०१८ रोजी राज्य माहिती आयोग, अमरावती खंडपीठ येथे रूजू झाले होते. श्री. कठाळे यांचा सदर २ वर्षाचा प्रतिनियुक्तीचा कालावधी दि. २५-१०-२०२० रोजी संपुष्टात आला होता. यास्तव संदर्भाधिन क्र. २ येथील दि. १८-०२-२०२१ च्या आदेशान्वये श्री. कठाळे यांच्या प्रतिनियुक्तीस २ वर्षाची (दि. २६-१०-२०२० ते २५-१०-२०२२ पर्यंत) मुदतवाढ देण्यात आलेली होती. श्री. कठाळे यांच्या ४ वर्षाच्या प्रतिनियुक्तीचा कालावधी (मुदतवाढीसह) दि. २५-१०-२०२२ रोजी संपुष्टात आलेला आहे.

२. उपसचिव, राज्य माहिती आयोग, खंडपीठ अमरावती यांनी संदर्भाधिन क्र. ३ येथील दिनांक १२-१२-२०२२ च्या पत्रान्वये श्री. कठाळे यांच्या प्रतिनियुक्तीस एक वर्ष मुदतवाढ देण्याची विनंती केली आहे.

३. श्री. कठाळे, यांच्या प्रतिनियुक्तीस ५ व्या वर्षासाठी मुदतवाढ देण्याबाबतची विनंती शासन स्तरावर मान्य करण्यात आली आहे. या आदेशान्वये श्री. कठाळे यांच्या प्रतिनियुक्तीस **(दिनांक २६-१०-२०२२ ते दिनांक २५-१०-२०२३ पर्यंत) एक वर्ष मुदतवाढ** देण्यात येत आहे.

४. प्रतिनियुक्ती संदर्भात सर्व अटी व शर्ती संदर्भाधीन क्र. १ च्या शासन आदेशात नमूद केल्याप्रमाणे असतील. श्री. कठाळे, यांच्या प्रतिनियुक्तीसंदर्भातील सदर मुदतवाढ ही अंतिम स्वरुपाची असून, त्यांना या पुढे कोणतीही मुदतवाढ देण्यात येणार नाही. तसेच त्यांना मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव पुन्हा **राज्य माहिती आयोग, अमरावती खंडपीठ** यांनी या विभागाकडे सादर करु नये. दिनांक २५-१०-२०२३ रोजी प्रतिनियुक्तीचा मुदतवाढीचा कालावधी समाप्त होताच त्यांच्या सेवा त्यांच्या मूळ विभागास म्हणजेच सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागास परत करण्यात याव्यात.

५. श्री. ग.र. कठाळे, सहायक कक्ष अधिकारी यांच्या अन्य सर्व प्रशासकीय बाबी सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग व सामान्य प्रशासन विभाग/कार्या. ६ यांच्यामार्फत हाताळण्यात येतील.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२४१८२६२२६६०७ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2023.02.24 18:30:30 +05'30'

**( वि. बा. माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. ग.र.कठाळे, सहायक कक्ष अधिकारी, (**राज्य माहिती आयोग, अमरावती खंडपीठ, अमरावती कार्यालयामार्फत**)

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२. सचिव, राज्य माहिती आयोग, मुख्यालय, १३ वा मजला, नविन प्रशासकीय इमारत, मंत्रालयासमोर, मुंबई- ४०० ०३२.
३. सहसचिव/उपसचिव (आस्थापना), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. सहसचिव/उपसचिव (का.६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. उपसचिव, राज्य माहिती आयोग, अमरावती खंडपीठ, शासकिय विश्राम भवन जवळ, कॅम्प, अमरावती-४४४६०२.
६. सा.प्र.वि./१४-अ (संग्रहार्थ).